महाराष्ट्र विकास सेवा, गट विकास अधिकारी, (एस-२०) गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्या- श्री. सी.एस. राजपुत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन आदेश क्रमांकः RDD-१३०११/१४५/२०२५/आस्था-३ (१८)

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट
मुंबई-४०० ००१
दिनांक: ३० मे, २०२५

**शासन आदेश:**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदींनुसार बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४ (१), ४ (२) व ४ (३) मधील तरतुदींनुसार, नागरी सेवा मंडळाची शिफारस तसेच बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने महाराष्ट्र विकास सेवा, गट विकास अधिकारी, (एस-२०) गट-अ संवर्गातील श्री. सी.एस. राजपुत यांच्या सर्वसाधारण बदलीबाबत शासन आदेश देत आहे. श्री. सी.एस. राजपुत यांची पदस्थापना खाली नमुद केल्याप्रमाणे त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| [१] | [२] | [३] | [४] |
| १. | श्री. सी.एस. राजपुत, गट विकास अधिकारी, पंचायत समिती खामगांव, जि. बुलढाणा. | गट विकास अधिकारी,पंचायत समिती, शेगांव, जि.बुलडाणा | श्री.व्ही.एम.कनाटे हे दि.३०.०६.२०२५ रोजी नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झाल्यानंतर. |

२. श्री. सी.एस. राजपुत यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार श्री.व्ही.एम.कनाटे हे दि.३०.०६.२०२५ रोजी नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झाल्यानंतर स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्र. : सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.०८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द

करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची अवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी पदस्थापना झालेल्या अधिकारी यांना त्यांच्या नियुक्तीच्या जागी रुजू होण्यासाठी उपरोक्त तक्त्यामधील स्तंभ क्र.४ मध्ये नमूद केल्यानुसार कार्यमुक्त करावे.

४. संबंधित अधिकारी यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. संबंधित अधिकारी विहित कालावधीत पदस्थापना झालेल्या पदावर रुजू न झाल्यास, उक्त अधिकाऱ्यांविरुध्द संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कारवाईचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५३०१६३२१८१२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2025.05.30 23:09:06 +05'30'

**(डॉ. उर्मिला जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (ग्रा.वि. व पं.रा), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा), यांचे स्वीय सहायक.
६. विभागीय आयुक्त, अमरावती.
७. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलढाणा
९. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. बुलढाणा

१०. संबंधित अधिकारी, (संबंधित विभागीय आयुक्त/मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. यांचेमार्फत)

११. कार्यासन आस्था-२, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.

१२. निवडनस्ती का. आस्था-३, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.